## कार्यरत सिंचन शाखांना मंजूरी मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र. आस्था २००५/७३८/(२४४/२००५)/सिंव्य(महसूल)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २७/९/२००६

**प्रस्तावना :**

जलसंपदा विभागातील पूर्ण झालेल्या प्रकल्पाद्वारे निर्माण झालेली सिंचन क्षमता विचारात घेऊन कपूर समितीच्या शिफारशींसह क्षेत्रीय स्तरावर कार्यरत असलेल्या शाखा कार्यालयांना मंजुरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासनाने आता खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :**

जलसंपदा विभागातील सोबतच्या सहपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार अधीक्षक अभियंता व प्रशासक/अधीक्षक अभियंता यांच्या अंतर्गत १४७ कार्यरत असणाऱ्या शाखांना मंजुरीसाठी प्रस्तावित करण्यात आले आहे. सदर १४७ शाखांना खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१) या १४७ शाखा कार्यालयांच्या मंजूरीमुळे सुधारित आकृतिबंधानुसार सद्यस्थितीत कोणतीही नवीन पदे निर्माण करता येणार नाहीत. उपलब्ध रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांकडून समकक्ष वेतनश्रेणीतील पदांची कामे अतिरिक्त कार्यभार देवून करुन घेण्यात यावीत .

२) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांकडून कामे करुन घेण्यात येत असल्याने भविष्यात याबाबत कर्मचा-यांकडून अवाजवी अपेक्षा निर्माण होणार नाही, अथवा न्यायालयीन प्रकरणे उद्भवू देवू नयेत.

३) प्रशासकीय आस्थापना खर्चात वाढ होणार नाही. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही

संकेतांक क्रमांक - 201412091322402227

४) सुधारित आकृतिबंधानुसार नवीन पदे निर्माण करावयाची असल्यास/भरावयाची असल्यास शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र. आढावा १००१/(३१३/२००१)(१)/आ(प्रशि), दिनांक ११/७/२००१ मधील प्रपत्रातील टिप्पणीमधील सूचनेनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रात दर्शविण्यात आलेल्या १४७ शाखांना शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

उपरोक्त आदेशानुसार मंजूर केलेल्या शाखा कार्यलयांची नावे व मुख्यालये आणि प्रत्येक शाखेचे कार्यक्षेत्र निश्चित करुन शासनास कळविण्यात यावे

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९३७६/व्यय-१२, दि. १२/४/२००२ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ज.म.अंबावे )
शासनाचे कक्ष अधिकारी

प्रत,

वित्त विभाग, (व्यय १२), मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे महामंडळे,
सर्व मुख्य अभियंते, जलसंपदा विभाग,
संबंधित अधीक्षक अभियंता/अधीक्षक अभियंता व प्रशासक जलसंपदा विभाग,
आ(क्षेप्र/प्रशि) कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय,
सिंव्य(म) संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्र. आस्था २००५/७३८/(२४४/२००५)/सिंव्य(महसूल), दिनांक २७/९/२००६ चे सहपत्र**

| अ. क्र. | कार्यालयाचे नांव | मंजुरी देण्यात आलेल्या सिंचन शाखांची संख्या |
|---|---|---|
| १. | अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाक्षेविप्रा नाशिक अंतर्गत | |
| | १) नाशिक पाटबंधारे विभाग, नाशिक | एकुण शाखा १४ |
| | २) अहमदनगर पाटबंधारे विभाग, अहमदनगर | एकुण शाखा ३ |
| | ३) मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर | एकुण शाखा ८ |
| २. | अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाक्षेवि प्राधिकरण, बीड अंतर्गत | |
| | १) शेतचारी अस्तरीकरण विभाग क्र.१, परळी(वै) | एकूण शाखा २४ |
| | २) जायकवाडी प्रकल्प जलनिस्सारण बांधकाम विभाग क्र.२, लातूर | एकुण शाखा ५ |
| ३. | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत<br>१) खडकवासला पा. वि. पुणे<br>२) निरा उजवा कालवा विभाग, फलटण<br>३) पुणे पाटबंधारे विभाग, पुणे<br>४) लघु पाटबंधारे विभाग क्र. अहमदनगर | एकूण शाखा २५ |
| ४. | अधीक्षक अभियंता व प्रशासक,-लाक्षेवि प्राधिकरण, सोलापूर अंतर्गत | |
| | १) उजनी धरण व्यवस्थापन विभाग, भीमानगर | एकूण शाखा १२ |
| | २) भीमा पाटबंधारे विभाग, पंढरपूर | एकूण शाखा १८ |
| | ३) भीमा वि. वि. क्र.२, सोलापूर | एकूण शाखा १८ |
| | ४) सोलापूर पा.वि. सोलापूर | एकूण शाखा १ |
| ५. | अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत | |
| | १) कोल्हापूर पा. वि. कोल्हापूर | एकूण शाखा १ |
| ६. | अधीक्षक अभियंता व प्रशासक लाक्षेवि प्रा जळगांव अंतर्ग, | |
| | १) धुळे पा. वि. धुळे | एकूण शाखा १६ |
| | २) गिरणा पा. वि. जळगांव | एकूण शाखा २ |
| | | **सर्व एकूण शाखा १४७** |

( ज. म. अंबादे )
शासनाचे कक्ष अधिकारी